**अपंग व्यक्ती, वरिष्ठ नागरिक व समाजातील दुर्लक्षित घटक यांच्यासाठी स्थापन ११ विशेष न्यायालयातील ५५ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : विशेन्या १३१८/प्र.क्र.२१०/का- नऊ**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक :- ०१ डिसेंबर, २०१८.

**पहा :** १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र: जगन्या १३१४/प्र.क्र.१६४/का-९, दिनांक ०३.०३.२०१८.

२) प्रबंधक (निरिक्षणे-१), उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. A(Spl.)/FTC/२०१८/१११/२०१८, दिनांक ३१.१०.२०१८.

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८.

**प्रस्तावना :**

अपंग व्यक्ती, वरिष्ठ नागरिक व समाजातील दुर्लक्षित घटक यांच्याशी संबंधित १००० पेक्षा जास्त प्रकरणे प्रलंबित आहेत अशा ११ ठिकाणी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये ११ विशेष न्यायालये स्थापन करण्यात आली आहेत. सदर न्यायालयाकरीता आवश्यक ५५ अस्थायी पदे निर्माण करण्यात आली असून सदर पदांना प्रथमतः दि.३०.०९.२०१८ पर्यंत सुरु ठेवण्यास मान्यता देण्यात आलेली होती. सदर अस्थायी पदे पुढे सुरु ठेवण्याची विनंती मा.उच्च न्यायालयाने संदर्भीय अनुक्रमांक २ येथील प्रस्तावान्वये केली आहे. संदर्भ क्र. ३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.१०.२०१८ ते २८.०२.२०१९ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर पदे पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

अपंग व्यक्ती, वरिष्ठ नागरिक व समाजातील दुर्लक्षित घटक यांच्याशी संबंधित १००० पेक्षा जास्त प्रकरणे प्रलंबित आहेत अशा ११ ठिकाणी स्थापन ११ विशेष न्यायालयातील एकूण ५५ अस्थायी पदे दि.०१ ऑक्टोंबर, २०१८ ते दि. २८ फेब्रुवारी, २०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मुदतवाढ देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **पदसंख्या** |
|---|---|---|
| १ | जिल्हा न्यायाधीश | ११ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | ११ |
| ३ | वरिष्ठ लिपीक | ११ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | ११ |
| ५ | शिपाई | ११ |
| | **एकूण पदे** | ५५ |

२. याकरिता येणारा खर्च "२०१४, न्यायदान- (भारित) १०२- उच्च न्यायालये, १०२ (०९) (०१) जलदगती न्यायालयांसाठी केंद्र पुरस्कृत विशेष अनुदान क्र. २०१४ ०३८८" या शिर्षाखाली सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८१२०४११५३५८८११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82acab3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84bb94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2018.12.04 11:57:57 +05'30'

**( अ. श्या. कलोती )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रत आवश्यक त्या तात्काळ कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. मा. प्रबंधक (निरिक्षणे-१), मा.उच्च न्यायालय, मुंबई,
३. मा.प्रबंधक (निरिक्षणे), उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई,
४. प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई
५. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी, मुंबई, ठाणे, अहमदनगर, सातारा, लातूर, पुणे, नागपूर, सांगली, नाशिक व औरंगाबाद
६. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी, मुंबई, ठाणे, अहमदनगर, सातारा, लातूर, पुणे, नागपूर, सांगली, नाशिक व औरंगाबाद
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. महालेखापाल -एक (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
१०. महालेखापाल -दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
११. विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४, २५,
१२. निवडनस्ती- कार्या. ९.